प्रशासकीय मान्यता :-

सन २०२१-२२ या वित्तीय वर्षात १३ कार्यालयीन खर्च या उद्दिष्टांतर्गत मंजूर अनुदानातून मुला-मुलींच्या वसतीगृहाकरीता फर्निचर साहित्य खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.

शासकीय वैद्यकीय महाविद्यालय , सातारा

**महाराष्ट्र शासन**

वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग

शासन निर्णय, क्रमांक : जीसीएस-२०२२/प्र.क्र.१२३/प्रशा-१

गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, नवीन मंत्रालय

९ वा मजला, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई -४०० ००१

दिनांक : ३१ मार्च, २०२२

**वाचा :**

१) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६

२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/ आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७

३) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक संकीर्ण-२०१६/प्र.क्र.२१५/ उद्योग-४, दिनांक २४.०८.२०१७

४) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०२१/प्र.क्र.८/ उद्योग-४, दिनांक ०७.०५.२०२१

५) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन,मुंबई यांचे पत्र क्र.संवैशिवसं/शावैमसातारा/ हॉस्टेल फर्निचर/म२/२१२१-२२/३४८२/२०२२, दिनांक : २६.०३.२०२२

**शासन निर्णय :-**

शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, सातारा या संस्थेस सन-२०२१-२०२२ या वित्तिय वर्षात १३ कार्यालयीन खर्च या उद्दिष्टांतर्गत मंजूर अनुदानातून खालील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे रुपये ११,५७,१०८/- (रुपये अकरा लक्ष सत्तावन्न हजार एकशे आठ फक्त) इतक्या किंमतीची साधनसामुग्री खरेदी करण्यास या शासन निर्णयान्वये पुढील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | यंत्राचे /साधनसामुग्रीचे नाव | प्रति नग | प्रति नग अंदाजित किंमत | एकूण किंमत |
|---|---|---|---|---|
| ०१ | **स्टील कपबोर्ड** | ३२ | १५६९४ | ५०५२०८ |
| ०२ | स्टडी टेबल | १०० | ४६०२ | ४६०२०० |
| ०३ | चेअर विथ हॅण्डल | १०० | १९४७ | १९४७०० |
| | | | एकूण | ११,५७,१०८ |

**अटी :-**

१) सदर प्रशासकीय मान्यता संबंधित संस्थेस सन-२०२१-२२ या वित्तिय वर्षामध्ये १३-कार्यालयीन खर्च या अनिवार्य खर्चाच्या उद्दिष्टांतर्गत निधी उपलब्धतेच्या अधीन राहून प्रदान करण्यात येत आहे.

२) सदर विषयी "शासकीय विभागाने करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची नियमपुस्तिका" याबाबत उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने निर्गमित केलेल्या शासन निर्णय क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६ व अनुषांगिक शासन निर्णयांमध्ये नमूद केलेल्या विहीत कार्यपध्दतीचे अनुपालन करण्यात यावे.

३) सदर साधनसामुग्री खरेदी विषयक प्रक्रिया “औषधे, तद्अनुषंगीक उपभोग्य वस्तू व वैद्यकीय उपकरणे या बाबींची खरेदी हाफकिन बायो-फार्मास्युटीकल्स कॉपोरेशन लि. मार्फत करण्याबाबत” निर्गमित शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७ नुसार करावी.

४) सदर साधनसामुग्रीची आवश्यकता असल्याचे व त्याची किंमत बाजारभावापेक्षा जास्त नसल्याची खात्री आयुक्त (वैद्यकीय शिक्षण) यांनी करावी.

५) सदर साधनसामुग्रीसाठी कोणत्याही नवीन बांधकामाची, विद्युतीकरणाची तसेच नवीन पदनिर्मितीची आवश्यकता नसल्याची खातरजमा करण्यात आलेली आहे.

६) सदर साधनसामुग्रीची विनिर्दिष्टे व्यापक, सर्वसमावेशक असून त्यानुसार साधनपुरवठा करु शकणारे किमान तीन उत्पादक/पुरवठादार यांचेकडून तीन निविदा प्राप्त होऊ शकतील अशा प्रकारची आहेत, असे आयुक्त (वैद्यकीय शिक्षण) यांनी प्रमाणित करावे.

७) प्रस्तावित साधनसामुग्रीचा समावेश इतरत्र कोणत्याही प्रस्तावात अंतर्भूत केलेला नसल्याबाबत व सदर साधनसामुग्री संबंधित संस्थेस आवश्यक असल्याबाबत आयुक्त (वैद्यकीय शिक्षण) यांनी खात्री करावी.

८) मुख्य यंत्र व त्यांचे सुटे भाग (Accessories) यांच्या किंमती भिन्न दर्शविणे आवश्यक राहील.

९) सदर विषयी साधनसामुग्री खरेदीबाबत निर्णय घेताना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेल्या लेखाशिर्षाखाली मंजूर अनुदानाच्या तरतूदीपेक्षा जास्त खर्च केला जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

१०) उपरोक्त शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, दिनांक ०१.१२.२०१६ मधील परिच्छेद क्रमांक ३.१.२ "किंमतीचा अंदाज व किंमतीचा वाजवीपणा" या शीर्षकाखालील परिच्छेद क्रमांक ३.१.२.१ मधील तरतूदीचे राज्यस्तरीय खरेदी समितीने अनुपालन करावे. सदर तरतूदीचे अनुपालन केलेल्या साधनसामुग्रीच्या किंमतीस आवश्यकतेनुसार सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येईल.

११) समान स्वरुपाची व समान विनिर्दिष्टे असलेल्या यंत्रसामुग्री व साधनसामुग्रीची एकच निविदा प्रसिध्द करणेबाबतची कार्यवाही हाफकीन महामंडळाने करावी. अशा प्रकारे निविदा प्रसिद्ध करणे हाफकीन महामंडळास शक्य होईल यानुषंगाने आयुक्त, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई यांनी यंत्रसामुग्री व साधनसामुग्री खरेदीची मागणी नोंदवावी.

१२) रुपये दहा लक्ष पेक्षा कमी किंमतीची तथापी एकापेक्षा अधिक संस्थांना आवश्यक असणारी यंत्रसामुग्री व साधनसामुग्रीची मागणी एकत्रित करून अशा बाबींची खरेदी हाफकीन महामंडळामार्फत करण्यात येईल.

१३) संस्थास्तरावर खरेदी करण्यात येणा-या यंत्रसामुग्री व साधनसामुग्रीची खरेदी शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, दिनांक ०१.१२.२०१६ च्या खरेदी धोरणातील कार्यपद्धतीनुसार करतांना याबाबत सदर खरेदी शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक संकीर्ण २०१४/प्र.क्र.२१५/उद्योग-४, दिनांक २४.०८.२०१७ अन्वये विहित करण्यात आलेल्या गव्हर्नमेंट ई मार्केटप्लेस (GEM) पोर्टल कार्यपद्धतीचा वापर करावा.

२. या प्रयोजनासाठी येणारा खर्च संबंधित संस्थेस खालील लेखाशीर्षातंर्गत मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

| मागणी क्रमांक एस-०१ | | |
|---|---|---|
| २२१० | - | वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य यावरील भांडवली खर्च |
| १०५ | - | विषमचिकित्सा |
| १३ | - | कार्यालयीन खर्च |
| | | २२१० ई ९११ |

३. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय, क्रमांक: विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/ विनियम, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-१, उप

विभाग-२, अनुक्रमांक-३, नियम क्रमांक-७ अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३३११५१९२३२९१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by SUDHIR JAYA SHETTY
Date: 2022.03.31 19:35:34 +05'30'
Adobe Reader version: 11.0.20

( सुधीर जया शेट्टी )
कार्यासन अधिकारी , महाराष्ट्र शासन

प्रति,

१. महालेखाकार - १ ( लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई .
२. आयुक्त,वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई
३. व्यवस्थापकीय संचालक, हाफकिन बायो-फार्मास्युटीकल्स कॉपोरेशन लि., मुंबई.
४. संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई.
५. अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय , सातारा
६. जिल्हा कोषागार अधिकारी, सातारा
७. निवडनस्ती (प्रशा-१)